अत्यंत निकडीचे

मुख्यमंत्री सहायता निधी [दुष्काळग्रस्त सहाय्य]
राज्यातील दुष्काळग्रस्त बांधवांना मदत -
शासकीय कर्मचा-यांकडून निधीत देणग्या -

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
परिपत्रक क्रमांक सीएमएफ-१०८६/१३६०/सीआर-३९/१६-अ,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक १९ मे १९८६.

शासकीय परिपत्रक

चालू वर्षी राज्यातील काही जिल्हयांवर भीषण दुष्काळाची छाया पसरली असून राज्यातील असंख्य खेडयातील दुष्काळग्रस्त बांधवांना मदत करण्यासाठी शासनाकडून प्रयत्नांची पराकाष्टा चालू आहे. या कार्यासाठी मुख्यमंत्र्यांच्या सहायता निधीला सढळ हाताने देणग्या देण्याचे मुख्यमंत्र्यांनी आवाहन केले आहे. या कामी लागणारा निधी उपलब्ध करुन देण्याच्या प्रयत्नात शासकीय अधिकारी आणि कर्मचारी आपल्या शक्तीनुसार वाटा उचलण्यात मागे राहणार नाही अशी शासनास खात्री आहे. तेव्हा, या संदर्भात इच्छुक व्यक्तींकडून देणग्या गोळा करण्यासाठी शासन खालीलप्रमाणे सूचना देत आहे:-

[१] तृतीय व चतुर्थ श्रेणी इच्छुक कर्मचा-यांच्या बाबतीत त्यांच्या इच्छेनुसार देणगीची रक्कम मे महिन्याच्या पगाराचे वाटप करताना जमा करण्यात यावी. जर अशी रक्कम मे १९८६ च्या पगारातून जमा करणे शक्य न झाल्यास ती रक्कम जून १९८६ च्या पगारातून जमा करण्यास हरकत नसावी.

[२] वर्ग-१ व वर्ग-२ च्या इच्छुक अधिका-यांनी त्यांच्या इच्छेनुसार देणगीची रक्कम त्यांच्या विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुखांकडे वरीलप्रमाणे मे अथवा जून १९८६ च्या पगारातून सुपूर्द करावी.

[३] प्रत्यक्ष वेतन बिलामध्ये हया रकमा कापून घेतल्याचे दाखवू नये, परंतु पगार देण्याकरिता तयार करण्यात आलेल्या वेतनपटावरच त्या जमा करण्यात आल्याचे दाखविण्यात यावे. शासकीय कर्मचा-यांकडून या रकमा मिळाल्याचे रोख पुस्तकामध्ये दर्शविण्यात यावे व मुख्यमंत्र्यांच्या सहायता निधीला देणगी म्हणून खर्च खाती टाकल्याचे दर्शविण्यात यावे.

[४] मंत्रालयीन विभाग, सर्व विभाग/कार्यालय प्रमुखांनी अशा प्रकारे गोळा करण्यात आलेल्या रकमा मंत्रालयातील मुख्यमंत्र्यांच्या सचिवालयाकडे रोखीने अथवा बँकेच्या डिमांड ड्राफ्टने पाठवाव्यात व रकमेची पोच पावती घ्यावी.

[५] या देणग्या स्वेच्छेने घावयाच्या आहेत. एखादया कर्मचा-याने देणगी देण्याबाबत नकार व्यक्त केल्यास त्याच्या वेतनातून रक्कम कापून घेण्यात येऊ नये.

२. वर नमूद केल्याप्रमाणे मुख्यमंत्र्यांच्या सहाय्यता निधीस जिल्हा परिषदा, विविध महामंडळे, शासनाचे अंगिकृत उपक्रम तसेच संस्था या मधील इच्छुक अधिकारी/कर्मचारीही देणग्या देवू शकतील.

३. मुख्यमंत्र्यांच्या कार्यालयाने सदर देणग्या स्वीकारुन प्रत्येक विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांना पोच पावती तात्काळ देण्याची व्यवस्था करावी.

[कृ.मा.प.]

४. हे परिपत्रक वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक-१०५१/८६ व्यय-४, दिनांक १२ मे १९८६ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

प्र. द. माळवे,
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री, राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
शासनाचे सर्व सचिव,
x प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
x प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
x प्रबंधक, लोक आयुक्त, उप लोक आयुक्त, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
महालेखापाल, [लेखा व अनुज्ञेयता] महाराष्ट्र-२, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
राज्यातील सर्व महामंडळे आणि उपक्रम यांचे सर्व व्यवस्थापकीय संचालक,
संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
[प्रसिध्दी पत्रक काढण्याच्या विनंतीसह],
मंत्रालयाचे विविध विभाग प्रमुख आणि कार्यालय प्रमुख,
वित्त विभाग,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सामान्य प्रशासन विभाग/का.क्र. १२, २१, २६,
निवड फाईल.
महालेखापाल, [लेखा व अनुज्ञेयता], महाराष्ट्र-१, मुंबई.

---

x पत्राने